वर्धा जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.१४५/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २४ जुलै, २०२३

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र जा. क्र.का-प्रआ/२२४३,दि.१८/०४/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रान्वये वर्धा जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद,वर्धा यांनी सदर रस्ता दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यावरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, वर्धा यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, वर्धा यांचा ठराव विचारात घेऊन वर्धा जिल्ह्यातील वर्धा तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | सावंगी पालोती वडद रामा-३२२ पासून आजनगाव सिरसगाव सोनेगाव (बाई) रस्ता. | इतर जिल्हा मार्ग क्रमांक-९५ | ०/०० ते १४/०० (१४.०० कि.मी.) | १४.०० कि.मी | **प्रमुख जिल्हा मार्ग-५१** |
| | | **एकूण** | | **१४.०० कि.मी** | |

परिणामी सदर रस्ते दर्जोन्नत झाल्यास वर्धा जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१४.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (८१३.६५० + १४.००) म्हणजेच **८२७.६५० कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्याच्या लांबीत **१४.०० कि.मी.**ने घट होवून एकूण लांबी (९२२.६५०-१४.००) म्हणजेच **९०८.६५० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२५१८००४९८६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.07.25 18:02:20 +05'30'

**( ग.सं. कचरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त,नागपूर.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, चंद्रपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.

२) जिल्हाधिकारी,वर्धा.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,वर्धा.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,वर्धा.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

७) निवडनस्ती.